**प्रधानमंत्री किसान ऊर्जा सुरक्षा एवंम उत्थान महाभियान (कुसूम) योजनेतंर्गत सर्वसाधारण घटकाच्या सौर कृषिपंप लाभार्थ्यांच्या शासन हिस्सापोटी अनुदान वितरीत करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

**उद्योग, ऊर्जा, कामगार व खनिकर्म विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः सौरप्र-२०२२/प्र.क्र.२०६/ऊर्जा-७.**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक: १३ मार्च, २०२४.

**वाचा :-**

१. शासन निर्णय, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, क्र.सौरप्र-२०१४/२०१९/ऊर्जा-७, दिनांक २७.०३.२०१५.
२. शासन निर्णय, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, क्र.सौरप्र-२०१४/२०१९(भाग-३)/ऊर्जा-७, दिनांक १४.०६.२०१७.
३. शासन निर्णय, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, क्र.सौरप्र-२०१९/प्र.क्र.२६८/ऊर्जा-७, दिनांक १२.०५.२०२१.
४. शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्र.अर्थसं-२०२३/प्र.क्र.४०/अर्थ-३, दिनांक १२.०४.२०२३.
५. शासन निर्णय, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, क्र.सौरप्र-२०२२/प्र.क्र.२०६/ऊर्जा-७, दिनांक १७.०५.२०२३.
६. शासन निर्णय, उद्योग, ऊर्जा, कामगार व खनिकर्म विभाग, क्र.सौरप्र-२०२२/प्र.क्र.२०६/ऊर्जा-७, दिनांक १८.१२.२०२३.
७. शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्र.अर्थसं-२०२३/प्र.क्र.४०/अर्थ-३, दिनांक ०५.०२.२०२४.
८. महाऊर्जा कार्यालयाचे पत्र क्र.लेखा/बीपी-०३४/सौरऊर्जा कृषिपंप (कुसूम-ब)/२०२३-२४/९३, दिनांक २५.०१.२०२४.

**<u>प्रस्तावना:</u>**

राज्यातील कृषीपंप वीज जोडण्यांचे सौर ऊर्जेद्वारे विद्युतीकरण करण्याच्या अभियानातंर्गत केंद्र शासनाच्या नवीन व नवीकरणीय ऊर्जा मंत्रालय, नवी दिल्ली यांचेकडून शेतकऱ्यांसाठी “प्रधानमंत्री किसान ऊर्जा सुरक्षा एवंम उत्थान महाभियान (कुसूम)” देशभरात राबविण्यात येत आहे. या योजनेतंर्गत केंद्र शासनाने दिनांक १३.०१.२०२१ रोजी १ लक्ष नग सौर कृषीपंप आस्थापित करण्यास दिलेली मान्यता विचारात घेऊन संदर्भाधिन क्र.३ येथील शासन निर्णयान्वये “राज्यातील कृषीपंप वीज जोडण्यांचे सौर ऊर्जेद्वारे विद्युतीकरण करण्याचे अभियान” जाहिर करण्यात आले आहे. सदर अभियानातील घटक “ब” अंतर्गत दरवर्षी एक लाख नग याप्रमाणे पुढील ५ वर्षामध्ये ५ लाख सौर कृषीपंप आस्थापित करण्यात येणार आहेत. सदर योजनेची अंमलबजावणी महाऊर्जा कार्यालयामार्फत करण्यात येत आहे. राज्यात कुसूम योजनेतंर्गत विविध लाभार्थ्यांसाठी सुकाणू समितीने वेळोवेळी दिलेल्या मंजूरीनुसार एकूण १,०४,८२३ सौर कृषीपंपासाठी कार्यादेश देण्यात आले असून, त्यापैकी एकूण ७६,५५३ सौर कृषिपंप महाऊर्जाकडून आस्थापित करण्यात आले आहेत. त्यामध्ये, सर्वसाधारण लाभार्थ्यांसाठी ६५,००८ सौर कृषीपंप आस्थापित करण्यात आले असून त्याकरीता आवश्यक एकूण रु.१२९.९७ कोटी इतक्या रकमेपैकी आतापर्यंत एकूण रु.११५.८२३१ कोटी इतका निधी शासनाकडून महाऊर्जाला उपलब्ध करून देण्यात आला आहे. सन २०२३-२४ या वित्तीय वर्षाकरीता मागणी क्रमांक के-६, लेखाशीर्ष क्र.२८१००९०२ खाली सर्वसाधारण लाभार्थी घटकासाठी रु.३३९.९०५९ कोटी इतका निधी अर्थसंकल्पित करण्यात आला आहे. सदर अर्थसंकल्पित निधीतून रु.३४.८६६१ कोटी इतका निधी सन

२०२३-२४ या वित्तीय वर्षाकरीता महाऊर्जा कार्यालयास संदर्भाधिन क्र.५ व ६ येथील शासन निर्णयान्वये वितरीत करण्यात आला आहे. आता, प्रधानमंत्री किसान ऊर्जा सुरक्षा एवंम उत्थान महाभियान (कुसूम) या अभियानाच्या घटक "ब" अंतर्गत सर्वसाधारण लाभार्थी घटकांसाठी आस्थापित केलेल्या सौर कृषी पंपाकरीता राज्य शासनाच्या १० टक्के हिस्स्यापोटी ऊर्वरित रु.१३.६४१९ कोटी इतका निधी सन २०२३-२४ या आर्थिक वर्षात मंजूर असलेल्या सुधारीत अंदाजाच्या रु.२४०.०४७९ कोटी इतक्या तरतूदीमधून महाऊर्जाला वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**<u>शासन निर्णय :-</u>**

राज्यातील कृषीपंप जोडण्यांचे सौर ऊर्जेद्वारे विद्युतीकरण करण्याच्या अभियानातंर्गत केंद्र शासनाच्या नवीन व नवीकरणीय ऊर्जा मंत्रालय, भारत सरकार यांचेकडून शेतकऱ्यांसाठी प्रधानमंत्री किसान ऊर्जा सुरक्षा एवंम उत्थान महाभियान (कुसूम) या अभियानाच्या घटक "ब" अंतर्गत सर्वसाधारण लाभार्थी घटकांसाठी आस्थापित करण्यात आलेल्या सौर कृषीपंपाकरीता राज्य शासनाच्या १० टक्के हिस्स्यापोटी उर्वरित रु.१३.६४१९ कोटी (तेरा कोटी चौसष्ट लाख एकोणवीस हजार फक्त) इतका निधी महाऊर्जाला वितरीत करण्यास मंजूरी देण्यात येत असून, सदर निधी महासंचालक, महाराष्ट्र ऊर्जा विकास अभिकरण, पुणे यांना उपलब्ध करून देण्यात येत आहे.

२. सदर रक्कम अदा करण्यासाठी श्री.नारायण श्री.कराड, उप सचिव (ऊर्जा), उद्योग, ऊर्जा, कामगार व खनिकर्म विभाग, मंत्रालय, मुंबई यांना नियंत्रक अधिकारी व श्रीम.गौरी पाटील, कार्यासन अधिकारी, उद्योग, ऊर्जा, कामगार व खनिकर्म विभाग, मंत्रालय, मुंबई यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

३. सदर निधी महासंचालक, महाराष्ट्र ऊर्जा विकास अभिकरण, पुणे (Director General, Maharashtra Energy Development Agency, Pune) यांच्या नावे अदा करण्यात यावा.

४. सौर ऊर्जा कृषीपंप बसविण्याचा कार्यक्रम योजनेवरील खर्चाचा, उद्दिष्टे व प्रत्यक्ष साध्यता याबाबतच्या माहितीसह मासिक व त्रैमासिक अहवाल लगतच्या महिन्याच्या १० तारखेपर्यंत महाऊर्जा कार्यालयाने शासनास सादर करावा. या शासन निर्णयान्वये मंजूर करण्यात आलेला निधी केवळ कुसूम योजनेतील घटक “ब” अंतर्गत सर्वसाधारण लाभार्थी घटकांसाठी आस्थापित करण्यात आलेल्या सौर कृषीपंपाकरीता सन २०२३-२४ या आर्थिक वर्षासाठी खर्च करण्यात येईल, याची खातरजमा करण्यात यावी. विहित कालावधीत सदर निधी कोणत्याही परिस्थितीत खर्च न होता महाऊर्जा कार्यालयाकडे पडून राहिल्यास त्याची संबंधितांवर जबाबदारी निश्चित करावी. मान्य व अनुज्ञेय काळात खर्च करण्याची जबाबदारी महासंचालक, महाऊर्जा यांची राहील. याबाबतचा त्रैमासिक अहवाल न चुकता सादर करण्याची जबाबदारी लेखाविषयक बाबी हाताळणाऱ्या सहायक/उप संचालक (लेखा) म्हणून कार्यभार पाहणाऱ्या अधिकाऱ्यांवर टाकण्यात यावी.

५. सदर निधीच्या लेख्यासंबंधीची कागदपत्रे, महाराष्ट्र ऊर्जा विकास अभिकरण, औंध रोड, स्पायसर कॉलेज समोर, पशुसंवर्धन आयुक्तालयाशेजारी, औंध, पुणे यांनी आवश्यक तेव्हा महालेखापाल, मुंबई, महाराष्ट्र-१ यांच्याकडे तपासणीसाठी सादर करावीत.

६. याबाबतचा खर्च “मागणी क्रमांक के-६, २८१० नवीन व नवीकरणीय ऊर्जा, ०२, सौर, १०२, प्रकाशव्होल्ट, (०१) सौर उर्जा कृषिपंप बसविण्याचा कार्यक्रम, (०१)(०१) सौर वीजेवरील कृषिपंप बसविण्यासाठी सहायक अनुदान, (राज्य हिस्सा) (कार्यक्रम), ३३, अर्थसहाय्य (२८१००९०२)” या लेखाशीर्षाखाली सन २०२३-२४ या आर्थिक वर्षासाठी मंजूर सुधारीत अंदाजित रकमेच्या तरतूदीमधून भागविण्यात यावा. या लेखाशीर्षाखाली निधी वितरीत करण्यासाठी सादर करण्यात येणाऱ्या देयकाच्या अनुषंगाने प्रमाणित करण्यात येते की, सदर देयक सशर्त असून या लेखाशीर्षाखाली कोणतेही संक्षिप्त देयक प्रलंबित नाही. तसेच, उपयोगिता प्रमाणपत्र प्रलंबित नाही.

७. सौर ऊर्जा कृषिपंप बसविण्याचा कार्यक्रम अंतर्गत सन २०२३-२४ या आर्थिक वर्षासाठी महाराष्ट्र ऊर्जा विकास अभिकरण, पुणे यांना निधी वितरीत करताना शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्र. अर्थसं-२०२३/प्र.क्र.४०/अर्थ-३, दिनांक १२.०४.२०२३ मधील आवश्यक त्या सूचना व अटींचे पालन करून तसेच,

शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्र.अर्थसं-२०२३/प्र.क्र.४०/अर्थ-३,दिनांक ०५.०२.२०२४ मधील तरतूदींनुसार आणि नियोजन विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र.९६/कार्या-१४६१, दिनांक १५.०२.२०२४ व वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र.६६/२०२४/व्यय-१६, दिनांक ०५.०३.२०२४ अन्वये दिलेल्या मान्यतेनुसार सदर शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे.

८. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२४०३१३१६२५४६२५१० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

PRADIP DATTATRAY BHINTADE

Digitally signed by PRADIP DATTATRAY BHINTADE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=INDUSTRY ENERGY AND LABOUR DEPARTMENT, 2.5.4.20=148166d6ba6b6b7506a6c02726418297ae7252d6770d6eeda6fcf82676c59eb5, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=70AB5B7C0DEE32FCEE54C2D940368CB9D34A7AEDC3404176B7D9B0082921CFF0, cn=PRADIP DATTATRAY BHINTADE
Date: 2024.03.13 16:35:46 +05'30'

**( प्रदिप भिंताडे )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा. राज्यपाल यांचे प्रधान सचिव, राजभवन, मुंबई,
२. मा.सभापती/मा.अध्यक्ष, महाराष्ट्र विधानपरिषद/विधानसभा यांचे सचिव, मुंबई,
३. मा.उप सभापती/मा.उपाध्यक्ष, महाराष्ट्र विधानपरिषद/विधानसभा यांचे सचिव, मुंबई,
४. मा.मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई,
५. मा.उप मुख्यमंत्री (ऊर्जा), महाराष्ट्र राज्य यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई,
६. मा.उप मुख्यमंत्री (वित्त व नियोजन), महाराष्ट्र राज्य यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई,
७. सर्व मंत्री/सर्व राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
८. सर्व विधानमंडळ सदस्य, विधान भवन, मुंबई,
९. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई,
१०. अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव (वित्त), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई,
११. अपर मुख्य सचिव (ऊर्जा), उद्योग, ऊर्जा, कामगार व खनिकर्म विभाग, मंत्रालय, मुंबई,
१२. अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव (कृषी), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई,
१३. अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव (नियोजन), नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई,
१४. सर्व अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव यांचे स्वीय सहायक, सर्व मंत्रालयीन विभाग, मुंबई,
१५. महालेखापाल, महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर,
१६. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई,
१७. सचिव, मा.महाराष्ट्र वीज नियामक आयोग, मुंबई (पत्राने),
१८. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य विद्युत मंडळ सूत्रधारी कंपनी मर्या.,मुंबई,
१९. अध्यक्ष व व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य वीज वितरण कंपनी मर्या.,मुंबई,
२०. अध्यक्ष व व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य वीज निर्मिती कंपनी मर्या.,मुंबई,
२१. अध्यक्ष व व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य वीज पारेषण कंपनी मर्या.,मुंबई,
२२. सर्व विभागीय आयुक्त,
२३. सर्व जिल्हाधिकारी,
२४. महासंचालक, महाराष्ट्र ऊर्जा विकास अभिकरण (महाऊर्जा),पुणे,
२५. मुख्य कार्यकारी अधिकारी, सर्व जिल्हा परिषदा,
२६. उप सचिव (ऊर्जा-३), उद्योग, ऊर्जा, कामगार व खनिकर्म विभाग, मंत्रालय, मुंबई,
२७. ऊर्जा उप विभागातील सर्व कार्यासने,उद्योग,ऊर्जा, कामगार व खनिकर्म विभाग, मंत्रालय, मुंबई,
२८. निवड नस्ती/ऊर्जा-७.